**अधिवेशन कालावधीत शिपाई उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २७१६/प्र.क्र.१०७/२१.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ जुलै, २०१७.

## परिपत्रक

महाराष्ट्र विधीमंडळाचे अधिवेशन चालू असताना मा.मंत्री महोदयांचे शिपाई यांना विधानपरिषद व विधानसभा या सभागृहामध्ये प्रवेश करण्यास मज्जाव असतो. यास्तव मा.मंत्री महोदयांची सभागृहातील कामे करण्यासाठी प्रत्येक अधिवेशन काळात सामान्य प्रशासन विभागातील १० रजा राखीव शिपायांच्या सेवा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयास उपलब्ध करुन देण्यात येत होत्या. तथापि, सामान्य प्रशासन विभागात असलेल्या शिपायांची कमतरता व शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १४ जानेवारी,२०१६ अन्वये गट “ड” संवर्गातील मंजूर पदांच्या २५% पदे निरसित करावयाचा निर्णय झाल्याने सामान्य प्रशासन विभागाकडून १० रजा राखीव शिपायांच्या सेवा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयास उपलब्ध करुन देणे शक्य होत नाही.

उपरोक्त वस्तूस्थिती लक्षात घेता मा.मंत्री व सत्ताधारी पक्षाच्या बाजूकडील विधानमंडळातील अधिवेशन कालावधीसाठीचे कामकाज करण्याकरिता सन २०१७ च्या हिवाळी अधिवेशनाकरिता व तदनंतर प्रत्येक अधिवेशनाकरिता सोबत जोडलेल्या सहपत्रातील विभागांमार्फत शिपाई यांच्या सेवा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत या परिपत्रकान्वये सूचना देण्यात येत आहेत.

मंत्रालयीन प्रशासकीय विभागांमार्फत अधिवेशन कालावधीकरिता शिपाई यांची नेमणूक करताना संबंधीत विभागाचे सह/उपसचिव(आस्थापना) यांनी खालील बाबींची दक्षता घेण्यात यावी.

१) मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील कार्यरत शिपाई यांचीच नियुक्ती करण्यात यावी.
२) नियुक्त केलेले शिपाई अधिवेशन कालावधीमध्ये नियमितपणे उपस्थित राहतील याची खातरजमा करावी.
३) नियुक्त केलेला शिपाई हा कर्तव्यदक्ष असावा.
४) नियुक्त केलेल्या शिपायांना त्यांचेकडील असलेले गणवेश वापरण्याच्यादृष्टीने स्वच्छ करुन विधानमंडळ सचिवालयात उपस्थित राहण्याबाबत सूचना करण्यात यावी.

वरीलप्रमाणे व्यवस्था हिवाळी अधिवेशन २०१७ पासून सुरु होत असल्याने महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे दिनांक २४ जुलै, २०१७ पासून सुरु होणा-या आगामी पावसाळी अधिवेशनाकरिता सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ने १० रजा राखीव शिपायांच्या सेवा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयास उपलब्ध करुन देण्यात याव्यात. तसेच इतर प्रशासकीय विभागातील शिपायांना सभागृहातील कामकाजाबाबतची माहिती होईपर्यंत सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ने पुढील हिवाळी अधिवेशन व तद्नंतर होणा-या प्रत्येक अधिवेशनाकरिता विधानपरिषद व विधानसभा या दोन्ही सभागृहात प्रत्येकी ३ रजा राखीव शिपायांची नियुक्ती करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७१८१५४६५५६३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2017.07.18 15:43:51 +05'30'

**( सो. ना. बागुल )**
सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
२) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालीयन प्रशासकीय विभाग
३) उप सचिव (प्रशासन), मुख्यसचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४)सह/उप सचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
५) खाजगी सचिव, सर्व मंत्री / राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई
६) उप सचिव (आस्थापना),महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई
७) निवड नस्ती.

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण २७१६/प्र.क्र.१०७/२१,
दिनांक : १८ जुलै, २०१७ चे सहपत्र

| महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिवेशन | वाटप करण्यात आलेला विभाग | उपलब्ध करुन द्यावयाचे शिपाई |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| प्रथम अधिवेशन (अर्थसंकल्पीय) | सामान्य प्रशासन विभाग | २ |
| | महसूल व वन विभाग | २ |
| | सार्वजनिक बांधकाम विभाग | २ |
| | विधी व न्याय विभाग | १ |
| | अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | १ |
| | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | १ |
| | सार्वजनिक आरोग्य विभाग | १ |
| द्वितीय अधिवेशन (पावसाळी) | वित्त विभाग | २ |
| | गृह विभाग | २ |
| | कृषि व पदुम विभाग | २ |
| | नियोजन विभाग | १ |
| | नगर विकास विभाग | १ |
| | आदिवासी विकास विभाग | १ |
| | गृहनिर्माण विभाग | १ |
| तिसरे अधिवेशन (हिवाळी) नागपूर | जलसंपदा विभाग | २ |
| | ग्रामविकास व जलसंधारण विभाग | २ |
| | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग | २ |
| | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | १ |
| | सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग | १ |
| | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | १ |
| | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | १ |